सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये "२०% बीज भांडवल योजना" व "सुधारित थेट कर्ज योजना" या योजना राबविण्याकरिता भाग भांडवली अंशदानासाठी निधी वितरीत करण्यास मंजूरी..... महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्यादित.

महाराष्ट्र शासन
इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पूरक-२०१९/प्र.क्र.५९/महामंडळे
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ डिसेंबर, २०१९

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ यांचे पत्र क्र.इमाविवि/२०१९-२०/लेखा/५८७, दि.०७ नोव्हेंबर, २०१९.

## शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास "२०% बीज भांडवल योजना" व "सुधारित थेट कर्ज योजना" या योजना राबविण्यासाठी पावसाळी अधिवेशन, २०१९ मध्ये बाब क्र.२२५ अन्वये पुरक मागणीव्दारे रु.४४.३२ कोटी एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतुदीमधून संदर्भिय दि.०८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकान्वये एकूण मंजूर तरतुदीच्या ६० टक्के मर्यादेत रु.२६,५९,२०,०००/- (रु.सव्वीस कोटी एकोणसाठ लक्ष वीस हजार फक्त) एवढे भाग भांडवली अंशदान खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच,ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.
२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.
६. सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.
७. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.
८. संदर्भिय दि.०८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकातील प्रत्येक अटींची पूर्तता महामंडळाकडून करण्यात यावी.

**०२.** वरील अनुदानाबाबत सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

**०३.** या बाबीवरील खर्च मागणी क्र.झेडजी-०४, ४२२५, अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण यावरील भांडवली खर्च, ०३, मागासवर्गाचे कल्याण, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर क्षेत्रातील गुंतवणूक, (०१) भाग भांडवली अंशदान, (०१)(०२) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळास भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२२५१९३१), ५४ गुंतवणुका या लेखाशीर्षाखली खर्ची टाकून सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०४.** हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४६६/२०१९/व्यय-१४, दि.०३ ऑगस्ट, २०१९ अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१०११४५३४७७२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

RAVINDRA
VASANTRAO GURAV

Digitally signed by RAVINDRA VASANTRAO GURAV
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e222c868eac72ecd12784, ou=VJNT OBC AND SBC DEPT, o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA VASANTRAO GURAV
Date: 2019.12.10 11:49:30 +05'30'

**(रविन्द्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. सह सचिव /उप सचिव (अर्थसंकल्प), इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई.
७. नियोजन विभाग (कार्यासन १४१३), मंत्रालय, मुंबई.
८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (महामंडळे)

****